विस्तार अधिकारी (पंचायत) व विस्तार अधिकारी (सांख्यिकी) या संवर्गाची कर्तव्य सूची (Job chart) तयार करणे.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८१७/आस्था-७

बांधकाम भवन, मर्झबान पथ, २५,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक: ११ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद विस्तार अधिकारी संघटना यांनी विस्तार अधिकारी (सांख्यिकी) या पदाची कर्तव्यसूची निश्चित करुन देण्याबाबतची मागणी केली आहे. तसेच या अनुषंगाने अनेक माहिती अधिकार कार्यकर्त्यांकडून देखिल वारंवार या पदांची कर्तव्यसूची (Job Chart) ची मागणी केली जात आहे. वरील दोन्ही पदांची अद्ययावत एकसमान कर्तव्यसूची शासनस्तरावर उपलब्ध नाही. त्यामुळे या दोन्ही पदांची कर्तव्यसूची तयार करण्यासाठी तज्ञ समिती गठीत करण्याची बाब विचाराधिन होती.

## शासन निर्णय:-

विस्तार अधिकारी (पंचायत) व विस्तार अधिकारी (सांख्यिकी) या पदांची कर्तव्य/ जबाबदाऱ्या/दैनंदिन कामकाजाचे स्वरुप विचारात घेऊन राज्यातील सर्व जिल्हा परिषदांकरीता एकसमान सुधारित कर्तव्यसूची (Job Chart) तयार करण्याकरीता खालील प्रमाणे तज्ञ समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | पद |
|---|---|---|
| १. | उपायुक्त (आस्थापना),विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग | अध्यक्ष |
| २. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर | सदस्य |
| ३. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य), जिल्हा परिषद, पुणे | सदस्य |
| ४. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य), जिल्हा परिषद, ठाणे | सदस्य |
| ५. | संचालक, राज्य ग्राम विकास संस्था, यशदा, पुणे | सदस्य |
| ६. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद, नांदेड | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहे.-

१.विस्तार अधिकारी (पंचायत) व विस्तार अधिकारी (सांख्यिकी) या पदांची कर्तव्य/ जबाबदाऱ्या/दैनंदिन कामकाजाचे स्वरुप विचारात घेऊन सर्व जिल्हा परिषदांकरीता एकसमान सुधारित कर्तव्यसूची (Job Chart) तयार करणे.

२. सदर समितीच्या अध्यक्षांना आवश्यकतेनुसार विभागीय/जिल्हास्तरावरील क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी यांना बैठकीस आमंत्रित करता येईल. तसेच मागणीप्रमाणे संघटनांच्या प्रतिनिधींना निमंत्रित करता येईल.

३. सदर समितीने अभ्यास करून दोन महिन्यांच्या मुदतीमध्ये अहवाल सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१११३३६४०६१२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN SADASHIV PAWAR

Digitally signed by NITIN SADASHIV PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=6614094c6d7b4373e0f4155726b3787040fe91de13496a24ea40186ad2f711e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1F1CAC965722168490DA843D1D64E01BF86ED2B91919DB9DDD0FC5517C81DEC8, cn=NITIN SADASHIV PAWAR
Date: 2024.03.11 16:00:17 +05'30'

( नितीन स.पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. उपायुक्त (आस्थापना),विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग
२. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
३. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य), जिल्हा परिषद, पुणे
४. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (सामान्य), जिल्हा परिषद, ठाणे
५. संचालक, राज्य ग्राम विकास संस्था, यशदा, पुणे
६. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत), जिल्हा परिषद, नांदेड

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा. विरोधी पक्ष नेते (विधानसभा/विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव
५) मा.मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
७) सर्व विभागीय आयुक्त

८) सर्व जिल्हाधिकारी
९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१०) सर्व उपायुक्त (विकास/आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये
११) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२) सर्व सह/उप सचिव, अवर सचिव, कार्यासन अधिकारी, ग्रामविकास विभाग
१३) अपर मुख्य सचिव (ग्राम विकास) यांचे स्वीय सहायक
१४) माहिती तंत्रज्ञान कक्ष (ग्रा.वि.वि), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१५) आपले सरकार कक्ष (ग्रा.वि.वि), बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१६) निवडस्ती, कार्यासन आस्था -७